**नागपूर महानगरपालिका हद्दीतील मौजा गाडगा येथील न.भु.क्र. ५. शिट क्र. १. आराजी १६५५ चौ.मी. जमिनीवरील “चाँद तारा दरबार ट्रस्ट" या धार्मिक स्थळाच्या नियमितीकरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नामपा-१२२२/प्र.क्र.२१२/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- ०७ मार्च, २०२५.

**वाचा** :- १. गृह विभाग, शासन निर्णय क्र. सीटीएम-०९०९/प्र.क्र.५५८ (भाग-२)/विशा-१ब, दि.०५ मे, २०११

२. उपायुक्त तथा सदस्य सचिव, महानगरपालिका स्तरीय समिती, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.अभि (स्था)/३३७ दि. ०२ ऑगस्ट, २०२२

**प्रस्तावना:-**

अनधिकृत धार्मिक स्थळांचे बांधकाम निष्कासित करणे, स्थलांतरित करणे अथवा नियमित करणे यासंदर्भात संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय दि. ०५ मे २०११ अन्वये कालबद्ध धोरण निश्चित करण्यात आले आहे. या शासन निर्णयातील तरतुद क्र.३. VI (अ) नुसार प्रत्येक “अ” वर्ग अनधिकृत धार्मिकस्थळाचे नियमितीकरण करण्याबाबत निर्णय जिल्हास्तरीय / महानगरपालिका स्तरीय समितीच्या स्तरावरच घेण्यात यावा व राज्य शासकीय समितीकडे यासंदर्भात एकत्रीत अहवाल पाठविण्यात यावा असे स्पष्ट करण्यात आले आहे.

यानुसार नागपूर महानगरपालिका हद्दीतील मौजा गाडगा येथील न.भु.क्र. ५. शिट क्र. १. आराजी १६५५ चौ.मी. जमिनीवरील “चाँद तारा दरबार ट्रस्ट" या धार्मिक स्थळाच्या नियमितीकरणाबाबत महानगरपालिका स्तरीय समितीने घेतलेला निर्णय राज्यस्तरीय समितीच्या निदर्शनास आणण्यासंदर्भात संदर्भ क्र. २ वरील पत्राद्वारे उपायुक्त तथा सदस्य सचिव महानगरपालिका स्तरीय समिती यांनी विनंती केली.

२. संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयामधील नियम ३ (iii) नुसार “जी अनधिकृत धार्मिक स्थळे ही दिनांक २९ सप्टेंबर, २००९ पूर्वी अस्तित्वात होती, त्यांच्याबाबतीत संबंधित नियोजन प्राधिकरणाचे अभिप्राय तसेच संबंधित भूधारकाची संमती घेवून त्याआधारे अनधिकृत धार्मिक स्थळांच्या निष्कासन/नियमितीकरण करणाबाबतचा प्रारुप कृती आराखडा सहा महिन्यात तयार करण्यात यावा.” असे निर्देश देण्यात आले आहेत.

त्यानुसार “चाँद तारा दरबार ट्रस्ट” या धार्मिक स्थळाचा प्रारुप कृती आराखडा शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर सहा महिन्यांतच म्हणजे सन २०१२ पूर्वी सादर करणे आवश्यक होते. तथापि, महानगरपालिकास्तरीय समितीने याबाबत २०२२ मध्ये कार्यवाही केल्याचे निदर्शनास येते. यामुळे “चाँद तारा दरबार ट्रस्ट" या धार्मिक स्थळाचे नियमितिकरण करण्याकरिता झालेला विलंब क्षमापित करून नागपूर महानगरपालिका स्तरीय समितीचा निर्णय कायम करण्यास मान्यता देणे आवश्यक आहे.

या पार्श्वभूमीवर महानगरपालिका स्तरीय समितीने घेतलेला निर्णय राज्यस्तरीय समितीच्या निदर्शनास आणणे व नियमितीकरणास झालेला विलंब क्षमापित करणे याबाबी शासनाच्या विचाराधीन होत्या.

**शासन निर्णय :-**

**अ)** नागपूर महानगरपालिका हद्दीतील मौजा गाडगा येथील न.भु.क्र. ५ शिट क्र. १ या आराजी ३८५३.५० चौ. मी. भूखंडाची मुळ मालकी नझुल (सरकार) ची आहे. या जागेपैकी पूर्वेकडील बाजूस "चाँद तारा दरबार" हे व्यापक लोकमान्यताप्राप्त धार्मिक स्थळाचे नियमितीकरण करण्याबाबत महानगरपालिका स्तरावरील समितीने घेतलेला निर्णय मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय समितीच्या निदर्शनास आणण्यात आला.

**ब)** शासन निर्णय दि. ५ मे, २०११, परिच्छेद क्र. ०४ नुसार धार्मिक स्थळांचे बांधकाम निष्कासित/नियमित/स्थलांतरीत करणेबाबत सदर कालबद्ध कार्यवाही करतांना प्रकरणपरत्वे समर्थनीय कारणास्तव मुदतवाढ देण्याचे तसेच महानगरपालिकास्तरीय समितीने घेतलेल्या कोणत्याही निर्णयाचे पुनरिक्षण करून त्यात सुधारणा/बदल करण्याचे अधिकार राज्यस्तरीय समिती व शासनाकडे आहेत.

नागपूर महानगरपालिका हद्दीतील मौजा गाडगा येथील न.भु.क्र. ५. शिट क्र. १. आराजी १६५५ चौ.मी. जमिनीवरील "चाँद तारा दरबार ट्रस्ट" हे "अ" वर्ग धार्मिक स्थळ असून हे सन १९७० पूर्वीपासून अस्तित्वात आहे. शासन निर्णयातील तरतूदीनुसार महानगरपालिकेद्वारे सन २०१८ पासून नियमितीकरणाची कार्यवाही सुरू करण्यात आली होती.

"चाँद तारा दरबार ट्रस्ट" या धार्मिक स्थळाची लोकमान्यता व धार्मिक महत्व लक्षात घेता सदर धार्मिक स्थळाचे नियमितिकरण करण्याबाबत महानगरपालिकेकडून झालेला विलंब क्षमापित करून नागपूर महानगरपालिका स्तरीय समितीचा निर्णय कायम करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०७१६३७२२५७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.03.07 16:38:34 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्य सचिव तथा अध्यक्ष यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (नगर विकास विभाग) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (नगर विकास विभाग) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त, नागपूर महानगरपालिका
९) सह सचिव (विशा-१ब), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती (नवि-२६)